**आदिवासी विकास विभागांतर्गत शासकीय आश्रमशाळा/वसतिगृह यांच्या बांधकाम व देखभाल दुरुस्तीकरीता सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गतचे विभाग/ उपविभाग आदिवासी विकास विभागाकडे समर्पित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र : ईएसटी-२०१६/प्र.क्र.६२/प्रशासन-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १४ जुलै, २०२३.

**वाचा :-** (१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.शाआशा-२०१५/प्र.क्र.९८/का-१३, दि.१४/०७/२०१६.
(२) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.ईएसटी-२०१६/प्र.क्र.६२/प्रशासन-१, दि.११/११/२०१६.
(३) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.ईएसटी-२०२१/प्र.क्र.१०/प्रशासन-१, दि.२३/०९/२०२१.

**प्रस्तावना :-**

आदिवासी विकास विभागातील शासकीय आश्रमशाळा व वसतिगृहांच्या इमारतींची बांधकामे आणि देखभाल दुरुस्तीची कामे करण्यासाठी शासन निर्णय दि.१४/०७/२०१६ अन्वये आदिवासी विकास विभागांतर्गत स्वतंत्र बांधकाम व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्यात आला आहे. आदिवासी विभागांतर्गत आश्रमशाळा व वसतिगृहाची कामे प्राथम्याने पूर्ण करण्याच्या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील कार्यरत विभाग व उपविभागांचा आढावा घेऊन सार्वजनिक बांधकाम विभागातील काही विभाग व उप विभाग शासन निर्णय दि.११/११/२०१६ अन्वये आदिवासी विकास विभागाकडे समर्पित करुन कार्यक्षेत्र निश्चित करण्यात आले होते. परंतु सांगली, सातारा, कोल्हापूर, सोलापूर, रत्नागिरी, सिंधुदूर्ग, उस्मानाबाद, औरंगाबाद, जालना, बीड व लातूर या जिल्हयातील आदिवासी क्षेत्र व कामे ही विखुरलेल्या स्वरुपात व तुलनात्मय अत्यल्प असल्याने सदर कामे कोणत्या

विभाग/उपविभागाकडे सोपवावी, याबाबत आदिवासी विकास विभागाने निर्णय घेणेबाबत शासन निर्णय दि.११/११/२०१६ अन्वये आदिवासी विकास विभागास सूचना देण्यात आल्या होत्या.

दरम्यान सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, दि.२३/०९/२०२१ अन्वये सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) विभाग, धुळे हे विभागीय कार्यालय, नाशिक येथे स्थलांतरीत करुन त्याचे नामाभिधान सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) विभाग, नाशिक करण्यास मान्यता देण्यात आली होती. तसेच मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांच्या अधिपत्याखालील अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धुळे यांच्या अंतर्गतच्या सार्वजनिक बांधकाम विभाग, धुळे यांचेकडील मार्ग प्रकल्प उपविभाग क्र.२, धुळे व इमारती प्रकल्प उपविभाग, धुळे हे दोन उपविभाग सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) विभाग, नाशिक यांच्या अधिपत्याखाली अनुक्रमे घोडेगांव व औरंगाबाद येथे स्थलांतरीत करुन त्यांचे नामाभिधान सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, घोडेगांव व सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, औरंगाबाद करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

तद्नंतर आदिवासी विकास विभागाने सांगली, सातारा, कोल्हापूर, सोलापूर, रत्नागिरी, सिंधुदूर्ग, उस्मानाबाद, औरंगाबाद, जालना, बीड व लातूर या जिल्हयातील आदिवासी क्षेत्र व कामे ही विखुरलेल्या स्वरुपात व तुलनात्मय अत्यल्प असल्याने सदर कामे कोणत्या विभाग/उपविभागाकडे सोपवावी याबाबत
आदिवासी विकास विभागाने निर्णय घेतला असून, त्यानुसार सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दि.११/११/२०१६ च्या शासन निर्णयात सुधारणा करण्याची विनंती केली होती. तद्नुसार सदर शासन निर्णयात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासकीय आश्रमशाळा व वसतिगृहाच्या बांधकामासाठी व वसतिगृहाची बांधकामे व देखभाल व दुरुस्तीसाठी सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, दि.११/११/२०१६ अन्वये समर्पित करण्यात आलेल्या विभाग, उपविभागाच्या कार्यक्षेत्रात शासनावर कोणताही अधिकचा आर्थिक भार पडणार नाही या अटीच्या अधीन राहून पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | | सध्याच्या विभागाची व उपविभागाची नांवे | सध्याचे मुख्यालय | सध्याचे कार्यक्षेत्र | सुधारित कार्यक्षेत्र |
|---|---|---|---|---|---|
| अ | | **अधिक्षक अभियंता, सा.बां. (आदिवासी) मंडळ, नाशिक** | **नाशिक** | **नाशिक, पुणे व कोकण प्रादेशिक विभागातील आदिवासी क्षेत्र** | **नाशिक, पुणे व कोकण प्रादेशिक विभागातील आदिवासी क्षेत्र व उस्मानाबाद जिल्हा** |
| | १ | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) विभाग, नाशिक | नाशिक | नाशिक, धुळे, जळगांव, अहमदनगर, नंदुरबार व पुणे जिल्हे | नाशिक प्रादेशिक विभाग नाशिक, धुळे, जळगांव,अहमदनगर, नंदुरबार जिल्हे |
| | i) | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, नाशिक | नाशिक | नाशिक, सिन्नर, येवला, निफाड, इगतपुरी, दिंडोरी, पेठ, त्र्यंबकेश्वर | कार्यक्षेत्रात बदल नाही. |
| | ii) | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, कळवण | कळवण | कळवण, सुरगाणा मालेगाव, चांदवड, नांदगांव, देवळा, बागलाण | कार्यक्षेत्रात बदल नाही. |
| | iii) | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, तळोदा | शहादा | अक्राणी, अक्कलकुवा, तळोदा, धडगांव | कार्यक्षेत्रात बदल नाही. |
| | iv) | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, धुळे | धुळे | धुळे, साक्री, शिरपूर, सिंदखेडा व जळगांव जिल्हा | कार्यक्षेत्रात बदल नाही. |
| | v) | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, नंदुरबार | नंदुरबार | नंदुरबार, शहादा, नवापूर | कार्यक्षेत्रात बदल नाही. |
| | vi) | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, संगमनेर | संगमनेर | पुणे व अहमदनगर जिल्हा | अहमदनगर जिल्हा |
| | २ | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) विभाग, ठाणे | ठाणे | ठाणे, पालघर व रायगड जिल्हा | कोकण व पुणे प्रादेशिक विभाग व उस्मानाबाद जिल्हा<br>(मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदूर्ग, पुणे, सांगली, सातारा, कोल्हापूर, सोलापूर, उस्मानाबाद जिल्हे) |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | i) | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, शहापूर | शहापूर | ठाणे, मुंबई व मुंबई उपनगर, रायगड जिल्हे | ठाणे, मुंबई व मुंबई उपनगर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदूर्ग जिल्हे |
| | ii) | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, डहाणू | डहाणू | पालघर, डहाणू, तलासरी, वसई | कार्यक्षेत्रात बदल नाही. |
| | iii) | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, जव्हार | जव्हार | जव्हार, वाडा, मोखाडा, विक्रमगड | कार्यक्षेत्रात बदल नाही. |
| | iv) | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, घोडेगांव | पुणे | अद्याप कार्यक्षेत्र देण्यात आलेले नाही. | पुणे, सांगली, सातारा, कोल्हापूर, सोलापूर, उस्मानाबाद जिल्हे |
| **ब** | | **अधिक्षक अभियंता, सा.बां. (आदिवासी) मंडळ, नागपूर** | **नागपूर** | **नागपूर, अमरावती, औरंगाबाद, प्रादेशिक विभागातील आदिवासी क्षेत्र** | **नागपूर, अमरावती, औरंगाबाद (उस्मानाबाद जिल्हा वगळून), प्रादेशिक विभागातील आदिवासी क्षेत्र** |
| | १ | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) विभाग, चंद्रपूर | चंद्रपूर | नागपूर, चंद्रपूर, भंडारा, गडचिरोली, गोंदिया, वर्धा जिल्हे | नागपूर प्रादेशिक विभाग (नागपूर, चंद्रपूर, भंडारा, गडचिरोली, गोंदिया, वर्धा जिल्हे) |
| | i) | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, नागपूर | नागपूर | नागपूर, उमरेड, सावनेर, रामटेक, हिंगणा, वर्धा, देवरी, सडक अर्जुनी, तिरोडा, सालेकसा, आमगाव भंडारा, तुमसर, साकोली, लाखनी, मोहाडी | कार्यक्षेत्रात बदल नाही. |
| | ii) | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, गडचिरोली | गडचिरोली | गडचिरोली, वडसा, आरमोरी, कुरखेडा, धानोरा, चार्मोशी, कोरची | कार्यक्षेत्रात बदल नाही. |
| | iii) | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, आलापल्ली | आलापल्ली | अहेरी, सिरोंचा, मुलचेरा, भामरागड, एटापल्ली | कार्यक्षेत्रात बदल नाही. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | iv) | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, चंद्रपूर | चंद्रपूर | चंद्रपूर, राजुरा, कोरपना, मुल, सावली, सिंदेवाही, गोंडपिंपरी, बल्लारपुर, पोंभुर्णा, जिवती, गडचांदुर, चिमुर, वरोरा, भद्रावती, नागभीड, ब्रम्हपुरी | कार्यक्षेत्रात बदल नाही. |
| | २ | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) विभाग, अमरावती | अमरावती | अमरावती, अकोला, बुलढाणा, वाशिम, यवतमाळ, हिंगोली, नांदेड जिल्हे | अमरावती व औरंगाबाद (उस्मानाबाद जिल्हा वगळून) प्रादेशिक विभाग (अमरावती, अकोला, बुलढाणा, वाशिम, यवतमाळ, हिंगोली, नांदेड, औरंगाबाद, लातूर, बीड, जालना, परभणी जिल्हे) |
| | i) | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, धारणी | धारणी | अमरावती, धारणी, चिखलदरा, मोर्शी, तिवसा, वरुड अकोला, वाशिम व बुलढाणा जिल्हे | कार्यक्षेत्रात बदल नाही. |
| | ii) | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, झरीजामणी | झरीजामणी | उमरखेड, महागांव, नेर, पुसद, दारव्हा, दिग्रस, आर्णी मारेगांव, यवतमाळ, कळंब, राळेगांव, बाभुळगांव, केळापुर, घाटंजी, वणी, झरीजामणी तालुके | कार्यक्षेत्रात बदल नाही. |
| | iii) | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, किनवट | किनवट | किनवट, बिलोली, मुखेड, मुदखेड, माहुर, भोकर, उमरी तसेच हिंगोली व परभणी जिल्हे | कार्यक्षेत्रात बदल नाही. |
| | iv) | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, औरंगाबाद | औरंगाबाद | अद्याप कार्यक्षेत्र देण्यात आलेले नाही. | औरंगाबाद, जालना, बीड व लातूर जिल्हे |

**२.** वर नमूद केल्यानुसार कार्यकारी अभियंता यांच्या नियंत्रणाखालील पुनर्रचनेप्रमाणे बांधकाम विभाग व उपविभाग कार्यालयांतर्गत अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतनावरील खर्च सार्वजनिक बांधकाम विभागाकडून मंजूर लेखाशिर्षाखालील अनुदानातून भागविण्यात यावा.

**३.** सदर शासन निर्णय हा आदिवासी विकास विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यांत येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१४१५४९३१२६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHINDE
VIKRAMSINGH
PRAKASHRAO

Digitally signed by SHINDE VIKRAMSINGH PRAKASHRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=1fbca76d11ad25e383a0e28da215f01e12183c1b565ddd29aaf1ffbfad8e9e9c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6F385E4139AB144CAAF92B440B55068479C3789EA50EC85EB7A16B7C932CB397, cn=SHINDE VIKRAMSINGH PRAKASHRAO
Date: 2023.07.14 15:50:38 +05'30'

**( विक्रमसिंह प्र. शिंदे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा.मंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव (रस्ते) / सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग.
७) मुख्य अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सर्व सह सचिव, उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) सर्व सह सचिव, उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
११) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४) निवडनस्ती.